# कलिसन्तरणोपनिषद्

मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवाद, आवश्यक टीपांसह

संपादक व अनुवादक

डॉ. नीलेश जोशी

M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री



# कलिसन्तरणोपनिषद्

मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवाद, आवश्यक टीपांसह


संपादक व अनुवादक

डॉ. नीलेश जोशी

M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री






eBook Publication Pvt. Ltd.®

प्रथमावृत्ती : ऑगस्ट २०१६

## कलिसन्तरणोपनिषद्

**मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवाद, आवश्यक टीपांसह**

**संपादक व अनुवादक : डॉ. नीलेश जोशी,**

**वरिष्ठ भाषाशास्त्रज्ञ, IIT मुंबई,**

**पवई, महाराष्ट्र ४०००७६**

**प्रथमावृत्ती : नारळी पौर्णिमा, १८ ऑगस्ट २०१६**

**प्रकाशक:**

**eBook Publication Pvt. Ltd.®**

4/47, उदय को. हौ. सोसायटी,

आरे रोड, गोरेगाव पश्चिम,

मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२

**Telephone:** +91 7038164022

**Email:** publicationebook@gmail.com

**Website:** https://archive.org/details/@ebook_publcation

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.



***eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.**

## संपादकीय

**॥ मङ्गलाचरणम् ॥**

**कलिसन्तरणोपनिषद्वेद्यपदतत्त्वस्वरूपकम् ।**

**पारमैश्वर्यविभवं रामचन्द्रपदं भजे ॥**

कलिसन्तरणोपनिषदाद्वारे जाणण्यास योग्य, पदतत्त्व स्वरूप, पारमैश्वर्याच्या वैभवाने संपन्न रामचंद्रपदाचे मी सेवन, भजन करतो.

हे तीन खंडाचे लघुकाय उपनिषद असून यात नारदमुनी व ब्रह्मदेव यांच्यातील संवाद वर्णिला आहे. नारदमुनींनी ब्रह्मदेवांकडे कलीपासून वाचण्याचा मार्ग विचारला आहे.

केवळ “हरे राम.... इत्यादी ” १९६ अक्षरी हरिनाम जपावे म्हणजे कलीच्या सर्व पापांचा नाश होतो आणि जेव्हा साडे तीन कोटी जप पूर्ण होईल, तेव्हा सर्वपापांपासून मुक्त होऊन जीव परमधाम वैकुंठास प्राप्त होतो.

**eBook Publication Pvt. Ltd.®** या पुस्तकाचे प्रकाशन करण्याचे मान्य केले त्याबद्दल मी त्यांचा विशेष आभारी आहे. वाचकांना हे छोटेखानी अप्रसिद्ध उपनिषद आवडेल, अशी आशा व्यक्त करतो. बाकी यशापयशबद्दलच्या अवघ्या आशा श्रीरामार्पण !!

**डॉ.नीलेश जोशी**

**नारळी पौर्णिमा, १८ ऑगस्ट २०१६**

# कलिसन्तरणोपनिषत्

-----------------------------------------------------------------

**॥ मङ्गलाचरणम् ॥**

**कलिसन्तरणोपनिषद्वेद्यपदतत्त्वस्वरूपकम् ।**

**पारमैश्वर्यविभवं रामचन्द्रपदं भजे ॥**

कलिसन्तरणोपनिषदाद्वारे जाणण्यास योग्य, पदतत्त्व स्वरूप, पारमैश्वर्याच्या वैभवाने संपन्न रामचंद्रपदाचे मी सेवन, भजन करतो.

**॥ शान्तिपाठः ॥**

**ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥**

**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

हे परमेश्वरा ! बरोबर असलेल्या आम्हां दोघांचे (गुरु व शिष्य यांचे) रक्षण करावे. बरोबर असलेल्या आम्हां दोघांचे पालन करावे. आम्ही दोघांनी बरोबरीने पराक्रम करावा. आमचे अध्ययन तेजस्वी होवो आणि आम्हां दोघांमध्ये कधीही विद्वेषाची भावना निर्माण होऊ नये.

त्रिविध तापांची शांती होवो.

====

**हरिः ॐ ।**

**द्वापरान्ते नारदो ब्रह्माणं जगाम कथं भगवन् गां पर्यटन् कलिं सन्तरेयमिति । स होवाच ब्रह्मा साधु पृष्टोऽस्मि सर्वश्रुतिरहस्यं गोप्यं तच्छृणु येन कलिसंसारं तरिष्यसि । भगवत आदिपुरुषस्य नारायणस्य नामोच्चारणमात्रेण निर्धूतकलिर्भवतीति ॥ १ ॥**

हरिः ॐ । द्वापारयुगाच्या अंती नारदमुनी ब्रह्मदेवाकडे गेले आणि म्हणाले, “हे भगवन् ! मी या भूलोकावर फिरत असताना कसे बरे कलीपासून माझी सुटका होईल ?”

तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, “ छान प्रश्न विचारला आहे. सगळया वेदांचे जे गुप्त ठेवण्यासारखे रहस्य आहे, ते ऐक, ज्यामुळे हा कलीचा संसार तरून जाता येईल. भगवान आदिपुरुष नारायणाच्या केवळ नामोच्चारणाने माणसाचे कलियुगातील सर्व दोष नष्ट होतात.(१)”



eBook Publication Pvt. Ltd.®

**नारदः पुनः पप्रच्छ तन्नाम किमिति । स होवाच हिरण्यगर्भः ।**

**हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।**

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥**

नारदमुनींनी पुन्हा विचारले,” ते कोणते नाव आहे ?” तेव्हा हिरण्यगर्भ ब्रह्मदेव म्हणाले,

“हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।

हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥”

**इति षोडशकं नाम्नां कलिकल्मषनाशनम् ।**

**नातः परतरोपायः सर्ववेदेषु दृश्यते ॥**

“हरे राम” इत्यादी १६ अक्षरी नामजप कलीच्या पापांचे नाश करणारे आहे. याहून अधिक श्रेष्ठ दुसरा कोणताही उपाय संपूर्ण वेदांमध्ये देखील पहावयास मिळत नाही.

**षोडशकलावृतस्य जीवस्यावरणविनाशनम् । ततः प्रकाशते परं ब्रह्म मेघापाये रविरश्मिमण्डलीवेति ॥ २ ॥**

या नामजपाद्वारे १६ कलांनी झाकलेल्या जीवाचे आवरण नष्ट होते. त्यानंतर जसे ढग नष्ट झाल्यानंतर सूर्यकिरणे प्रकाशित होऊन दिसू लागतात, अगदी तसेच परब्रह्माचे स्वरूप प्रकाशित होते. (२)

**पुनर्नारदः पप्रच्छ भगवन् कोऽस्य विधिरिति । तं होवाच नास्य विधिरिति । सर्वदा शुचिरशुचिर्वा पठन् ब्राह्मणः सलोकतां समीपतां सरूपतां सायुज्यमेति ।**

पुन्हा नारदमुनींनी विचारले, “हे भगवन् या नामोच्चारणाचा कोणता विधी आहे का ?”

तेव्हा त्यांना ब्रह्मदेव म्हणाले, “या नामोच्चारणाचा कोणताही विधी नाही. पवित्रपणे किंवा अपवित्रपणे कसेही सतत या नामाचा जप करणारा सालोक्य, समीपता, सरूपता व सायुज्यता या चार प्रकारची मुक्ती प्राप्त करतो.”

**यदास्य षोडशकस्य सार्धत्रिकोटीर्जपति तदा ब्रह्महत्यां तरति । तरति वीरहत्याम् । स्वर्णस्तेयात् पूतो भवति । वृषलीगमनात् पूतो भवति । पितृदेवमनुष्याणामपकारात् पूतो भवति । सर्वधर्मपरित्यागपापात् सद्यः शुचितामाप्नुयात् । सद्यो मुच्यते सद्यो मुच्यते इत्युपनिषत् ॥ ३ ॥**

जेव्हा या १६ अक्षरी नाममंत्राचा साडे तीन कोटी जप होतो, तेव्हा साधक ब्रह्महत्येच्या पातकातून तरतो, वीरहत्येच्या पातकातूनही तरतो. सोने चोरीच्या पातकातून मुक्त होतो. पितर, देवता आणि माणसाबाबत केलेल्या अपकारच्या दोषातूनही सुटतो. सर्वधर्मांच्या परित्यागाच्या पापातूनही तत्काळ पवित्र होतो. शीघ्रच मुक्त होतो, शीघ्रतेने मुक्त होतो.

असे हे उपनिषद संपूर्ण झाले. (३)

**ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यंकरवावहै । तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।**

==================================================

## कलिसन्तरणोपनिषद्

हे तीन खंडाचे लघुकाय उपनिषद असून यात नारदमुनी व ब्रह्मदेव यांच्यातील संवाद वर्णिला आहे. नारदमुनींनी ब्रह्मदेवांकडे कलीपासून वाचण्याचा मार्ग विचारला आहे.

केवळ “हरे राम.... इत्यादी ” १९६ अक्षरी हरिनाम जपावे म्हणजे कलीच्या सर्व पापांचा नाश होतो आणि जेव्हा साडे तीन कोटी जप पूर्ण होईल, तेव्हा सर्वपापांपासून मुक्त होऊन जीव परमधाम वैकुंठास प्राप्त होतो.

**डॉ. नीलेश जोशी**

**नारळी पौर्णिमा, १८ ऑगस्ट २०१६**

